**कृषी वर आधारित व अन्न प्रक्रिया उद्योगांना सामुहिक प्रोत्साहन योजना २०१९अंतर्गत मोठे व विशाल प्रकल्पांसाठी विहीत गुंतवणूकीचे /रोजगाराचे निकष व प्रोत्साहने सुधारीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक : साप्रोयो २०२०/ प्र.क्र.८०/ उद्योग-८,**
मंत्रालय,मुंबई.-४०००३२.
**दिनांक - ८ सप्टेंबर, २०२१**

वाचा -

शासन निर्णय साप्रोयो २०२०/ प्र.क्र.८०/ उद्योग-८, दि. ३१.०८.२०२०

**प्रस्तावना :-**

१. वाचा येथे नमुद दि. ३१.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये कृषी वर आधारित व अन्न प्रक्रिया उद्योगांना सामुहिक प्रोत्साहन योजना २०१९ अंतर्गत मोठे व विशाल प्रकल्पांसाठी विहीत गुंतवणूकीचे / रोजगाराचे निकष व प्रोत्साहने सुधारीत करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील परि.क्र.(क) (१) मध्ये खालील प्रमाणे नमुद करण्यात आले आहे. :-

> "कृषी आधारीत व अन्न प्रक्रिया क्षेत्रात ज्या घटकांनी गुंतवणुक केली आहे अशा घटकांना "कोविड-१९ मुळे दिनांक २३ मार्च, २०२० पासुन राज्यात टाळेबंदी (लॉकडाऊन) लागू करण्यात आल्याने दिनांक १ एप्रिल २०२० नंतर पात्रता प्रमाणपत्र घेतलेल्या" घटकांनाही सदर लाभ अनुज्ञेय राहतील. सदर प्रोत्साहने सामुहीक प्रोत्साहन योजना २०१९ चा योजना कालावधी दिनांक ३१.०३.२०२४ पर्यंत लागू राहतील."

२. सदर शासन निर्णयातील परि.क्र.(क) (१) नंतर खाली नमुद (अ), (ब) आणि (क) येथे अंतर्भूत बाबीचा समावेश करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) कृषी व अन्न प्रक्रियेवर आधारित उद्योग घटकांना दि. ३१.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले अनुज्ञेय लाभ देण्यासाठी मोठया प्रकल्पांसाठीचा गुंतवणूक कालावधी हा दि. ३१.०८.२०२० रोजीचा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापूर्वीचे ४ वर्षे म्हणजेच दि. ३१.०८.२०१६ पासून पुढील कालावधीतील घटक मागणी करेल त्या कोणत्याही ४ वर्षे कालावधीतील घटकाची गुंतवणूक ग्राहय धरण्यासाठी सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ मधील परि.क्र. २.९ मध्ये गुंतवणूक कालावधीसाठी विहित करण्यात आलेल्या तरतूदीतून सूट देण्यात येत आहे.

(ब) कृषी व अन्न प्रक्रियेवर आधारित उद्योग घटकांना दि. ३१.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले अनुज्ञेय लाभ देण्यासाठी विशाल प्रकल्पांसाठीचा गुंतवणूक कालावधी हा दि. ३१.०८.२०२० रोजीचा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापूर्वीचे ५ वर्षे म्हणजेच दि. ३१.०८.२०१५ पासून पुढील कालावधीतील घटक मागणी करेल त्या कोणत्याही ५ वर्षे

कालावधीतील घटकाची गुंतवणूक ग्राहय धरण्यासाठी सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ मधील परि.क्र. २.९ मध्ये गुंतवणूक कालावधीसाठी विहित करण्यात आलेल्या तरतूदीतून सूट देण्यात येत आहे.

(क) कृषी व अन्न प्रक्रियेवर आधारित उद्योग घटकांना अनुज्ञेय करण्यात आलेले लाभ देण्याबाबतच्या योजनेची अंमलबजावणी करण्यासंदर्भात दि ३१.०८.२०२० .रोजीचा शासन निर्णय तसेच दि १६.०९.२०१९ .रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींचा अर्थ निश्चीत करुन प्रसंगानुरुप व प्रकरणपरत्वे शिफारस करण्याचे अधिकार दि १६.०९.२०१९ .रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१० अन्वये विहित करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीस प्रदान करुन सदर समितीच्या शिफारसींवर मा. मंत्री(उद्योग) यांनी दिलेल्या निर्णयानुसार प्रकरणपरत्वे पुढील कार्यवाही करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असुन सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२१०९०८१४४०२८७३१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2021.09.08 14:42:22 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव (५ प्रत्र)
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव (५ प्रती)
३. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५ प्रती)
४. सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
५. मा.विरोधी पक्षनेता ,विधान परिषद / विधान सभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय , मुंबई
६. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
७. मुख्य सचिवांचे यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव ,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय ,विधान भवन, मुंबई
१०.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग ,मुंबई
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय ,मुंबई (५ प्रती)
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
१३.विकास आयुक्त उद्योग, उद्योग संचालनालय, मुंबई
१४.मैत्री कक्ष, मुंबई